उप सचिवांची २ पदे श्रेणी वाढ करुन सह सचिव पदांत रुपांतरीत करणे व सदर रुपांतरीत पदांवर श्री. ग. कि. वाघ, सह सचिव व श्री. उ. शि. लोणारे, सह सचिव यांची नियुक्ती करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांकः आस्थाप्र-२०१४/प्र.क्र.३१४/आस्था-१,**

मंत्रालय (विस्तार), हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई ४०० ०३२,
तारीख: ०९ ऑक्टोबर, २०१४

वाचा :

१) शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, आदेश क्र.ससप-१११३/प्र.क्र.११०/१३/का.१४, दि.२८.०८.२०१४.

२) कार्यालयीन आदेश, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.आस्थाप्र-२०१४/प्र.क्र.३१४/आस्था-१, दि.२८.०८.२०१४.

**शासन निर्णय:**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दि.२८.०८.२०१४ च्या आदेशांन्वये श्री. ग. कि. वाघ, सह सचिव व श्री. उ. शि. लोणारे, सह सचिव यांची आंतरविभागीय बदलीने या विभागात उप सचिव संवर्गातील रिक्त पदांवर पदस्थापना करण्यात आली आहे. त्यानुसार संदर्भ क्र.२ येथील विभागाच्या दि.२८.०८.२०१४ च्या आदेशांन्वये श्री. ग. कि. वाघ, सह सचिव व श्री. उ. शि. लोणारे, सह सचिव यांना या विभागात दि.२८.०८.२०१४ (म.पू.) पासून रुजु करुन घेण्यात आले आहे. तथापि, या विभागात सह सचिवांची पदे उपलब्ध नसल्याने उप सचिव संवर्गातील वेतनबँड रु.१५६००-३९१०० + ग्रेड पे रु.७६००/- मधील २ रिक्त पदे वेतन बँड रु.३७४००-६७००० + ग्रेड पे रु.८७००/- मध्ये श्रेणी वाढ करुन दि.२८.०८.२०१४ (म.पू.) पासून सह सचिव या पदांत रुपांतरीत करण्यात येत आहेत. रुपांतरीत झालेल्या सदर पदांवर श्री. ग. कि. वाघ, सह सचिव व श्री. उ. शि. लोणारे, सह सचिव यांची दि.२८.०८.२०१४ (म.पू.) पासून पदस्थापना करण्यात येत आहे. सह सचिव पदात श्रेणीवाढ केलेली पदे श्री. ग. कि. वाघ, सह सचिव व श्री. उ. शि. लोणारे, सह सचिव हे त्या पदांवर कार्यरत असेपर्यंतच अस्तित्वात राहतील, त्यानंतर ती पदे मूळ पदांमध्ये रुपांतरीत होतील.

२. यावरील होणारा खर्च सन २०१४-१५ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर झालेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक: ३१४/२०१४/सेवा ९, दि.३०.०९.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१००९१३१८२७४१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pratap Pandurang Lubal

Digitally signed by Pratap Pandurang Lubal
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pratap Pandurang Lubal
Date: 2014.10.09 16:55:42 +05'30'

**(प्र.पां.लुबाळ)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३. श्री. ग. कि. वाघ, सह सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. श्री. उ. शि. लोणारे, सह सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. अवर सचिव (लेखाशाखा), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. उप सचिव (का.१४), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८. उप सचिव (का.सेवा-९), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९. मा.सचिव यांचे स्वीय सहायक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.निवडनस्ती (का.आस्था-१).